# विंदा करन्दिकर यांना एक पत्र

सा.न. वि. वि.

हे पत्र पाहून तुम्हाला आश्चर्य वाटेल. कदाचित पहिलाच प्रश्न विचाराल हा कोण उपटसुंभ? कशासाठी लिहितोय ? पण परवा एक घटना घडली, माझ्या एका मध्यमवयीन मित्राने मला विचारले, " तू काय केवळ मागल्या पिढीतील सगळ्या कवींची धोतरे फेडत लिखाण करणार आहेस का ? तरुण वयाचा परिणाम मी समजू शकतो. टी.व्ही. संस्कृतीत तुम्ही वाढलात हेही कबूल आहे, पण म्हणून मागचे सगळेच कवी आणि कविता रद्दबादल कशा काय होऊ शकतात? तुला ह्या लोकांच्यात काहीच कसे पॉझिटिव्ह आढळत नाही ? "

हा मित्राचा प्रश्न खरेतर अनेकदा विचारला गेलेला ! वि. स. खांडेकरांना " मोठ्या लोकांसाठी बालवाङ्मय लिहिणारा कादंबरीकार" असे कॉलेज कट्ट्यावर म्हटल्यानंतर प्रथम एकाने पोटतिडकीने विचारलेला ! नंतर त्या प्रश्नाची सवय झाली. पण परवा मात्र ह्या प्रश्नानंतर भराभर मराठी कवितेचे एक शतक डोळ्यासमोरून सरकू लागले. बोरकर, शिरवाडकर, मर्ढेकर आणि तुम्ही असे चार 'कर' समोर दिसू लागले. पु. शि. रेगे, चित्रे, कोलटकर, काळसेकर, ओक, डहाके, सुर्वे, ढसाळ, महानोर, प्रकाश जाधव, सदानंद रेगे, ग्रेस ह्यांनी दिलेले योगदान खुणावू लागले आणि क्षणभर मस्तक नम्र झाले. बोरकरांनी दिलेले भूमिनिष्ठ परिमाण, शिरवाडकरांच्या राष्ट्रवादी जाणिवेतील अस्सलपणा, मर्ढेकर आणि मुक्तिबोध यांनी मराठी कवितेचे केलेले आधुनिकीकरण डोळ्यासमोर नाचू लागले आणि मग मराठीतील आधुनिक काळातील पहिला बृहद्कवी दिसू लागला. तुकारामानंतर प्रथमच एवढा मोठा कवितेत आणला गेलेला जाणिवांचा फलक गर्जून सांगू लागला...

*देणाऱ्याने देत जावे*
*घेणाऱ्याने घेत जावे*
*घेता घेता एक दिवस*
*देणाऱ्याचे हात घ्यावे*

विंदा, तुम्ही आम्हाला काय दिलंत? प्रश्न दिसायला सोपा, पण उत्तर देताना धाप लागेल असा !

मराठीत मर्ढेकरांनी कवितेला आधुनिक जाणीव दिली, तर पु. शि. रेगेंनी आधुनिक आकृतिबंध दिला. तुम्ही ह्या दोन्हींना प्रायोगिकता दिलीत. ह्यातील काही प्रयोग यशस्वी झाले, काही प्रयोग

अयशस्वी झाले. 'करंदीकरांनी प्रयोग केले नसते तर ते महान कवी झाले असते,' असं एकदा मी कॉलेजकट्ट्यावर आततायीपणे म्हटले होते, पण नंतर तुमचे प्रयोग नीट तपासून पाहताच स्वतःच्याच विधानाने ओशाळून गेलो होतो. तुमची आकृतिबंधातील प्रायोगिकता ही तुमच्या आशयाची गरज होती. क्वचित गझलेसारख्या ठिकाणी ती कृत्रिम वाटली, पण मुक्त सुनिते/तालचित्रे ह्यामधील तुमची झेप स्तिमित करणारी होती. मराठीतील अस्सल मुक्तछंद तुम्हीच दिलात. खटकेबाज झपाट्या हा तर तुमच्या 'दातापासून दाताकडे'सारख्या कवितेतून आशयाला नवीन व चमत्कारिक रीतीने भारून टाकणारा आणि ऊर्जेची स्त्रोतकेंद्रे विझवत, पेटवत जाणारा टेंभा होता. इंग्रजीत टी. एस. इलियटनंतर ऑडेनने जशी वेगळी गीतात्मक कविता लिहिली, त्यासाठी विविध प्रयोग केलेत, (त्याबद्दल त्याला 'व्हर्सचा पिकासो' असेही गौरविले गेले.) तसेच प्रयोग तुम्ही सुनिते, अभंग, गझल आणि ठेकेदार मुक्तछंद यांच्यात केले. ऑडेनने वैज्ञानिक, मानसशास्त्रीय आणि मार्क्सवादी जाणिवांची नाळ आपल्या कवितेशी जोडून घेऊन तिला बहुआयामी बनविले, तसेच तुम्हीही आपल्या कविततेला बहुआयामी केले. मात्र ऑडेनला कधीही टी. एस. इलियटच्या फार पुढे झेप घेता आली नाही. कारण मुळात टी.एस. इलियटची झेपच मोठी होती. मराठीत मात्र मर्ढेकरांनी पादाकुलकाला बांधून घेतल्याने तुमचे त्यापुढचे प्रयोग हे अधिक चित्तवेधक ठरले. त्यातच तुमची जाणीव मर्ढेकरांपेक्षा अधिक बहुलक्षी असल्याने तुकाराम जसा ज्ञानेश्वरापेक्षा मोठा झाला तसे तुम्ही मर्ढेकरांपेक्षा अधिक मोठे झालात. तुमची कविता ही अधिक समृद्ध झाली. कवितेच्या इतिहासात अनेकदा बीजकवीवर अधिक चर्चा होते आणि बृहद्कवीवर मात्र ती तितकी होत नाही. मराठीतले आधुनिक काळातील बीजकवी केवळ इतरांच्या आधी त्यांनी परदेशी कविता वाचून पचवल्या ह्या क्वालिफिकेशनवर बीजकवी ठरत असल्याने मला त्यांच्या 'बीज'पणाविषयी फारसा आदर नाही. ज्ञानेश्वरांनंतर मराठीत एकही अस्सल बीजकवी झालेला नाही असे माझे आपले प्रामाणिक मत आहे. त्यामुळेच फुले, केशवसुतांच्या बीजपणापेक्षा किंवा मर्ढेकरांच्या बीजपणापेक्षा बोरकर, शिरवाडकर किंवा तुमचा बृहद्पणा मला मोठा वाटतो. 'तुम्ही आम्हाला काय दिलंत ?' ह्या प्रश्नाचं पहिलं उत्तर, 'आधुनिक काळातील पहिला बृहद्कवी तुम्ही आम्हाला दिलात. तुम्ही आम्हाला आधुनिक शैलीतील प्रायोगिकता दिली' हे आहे.

लोकशाही समाजवाद हा तुमच्या युगाचा धर्मच होता, पण मराठी कवितेत ह्या संकल्पनेचे सर्वांगीण प्रतिबिंब तुमच्यापूर्वी कधीच पडले नाही. लोकशाहीतील व्यक्तिस्वातंत्र्य आणि सामाजिक विकासासाठी समाजवाद, भारतीय अध्यात्मिकतेचे 'लौकिक' आकर्षण, बुद्धिप्रामाण्यवाद व वैज्ञानिक निष्ठा, जगातील सर्वच चिंतनाचा आणि चिंतांचाही देशाचा बकूब न ओळखताच

केलेला स्वीकार, त्यातून नेहरूंनी उडविलेली आंतरराष्ट्रीय शांततेची पिकासो शैलीतील काव्यातच शोभतील अशी कबूतरे ह्या साऱ्या सामाजिक चलनवलनाचा सर्वांगीण फलक तुमच्या कवितेत स्पष्ट उमटलेला दिसतो. म्हणूनच यंत्राचे स्वागत करणारी तुमची कविता भांडवलशाही प्रवृत्तींच्या विरोधी रुढतानाही दिसते. एका अर्थाने मध्यमवर्गाची मध्यममार्गी मिश्र 'अर्थ'व्यवस्था म्हणजे तुमची कविता होय. तुमच्याबरोबरचे अनेक तथाकथित कवी आशा न ठेवताच निराश झाले. त्यांनी युरोपियन निराशा पुस्तकांत वाचली आणि ते तिला ॲकॅडेमिक साजशृंगार चढवून आपल्या कवितेत तिचे शब्दांशी लग्न लावून रिकामेही झाले. तुमची कविता मात्र नेहरू युगाबरोबर फुलली, खुलली आणि नेहरूयुगाच्या क्रमशः होत चाललेल्या ऱ्हासाबरोबर आस्तेकदम विरूपिका होण्यापर्यंत पोहोचली. स्वच्छंद ते विरूपिका हा वरकरणी आकृतिबादी वाटणारा तुमचा प्रवास प्रत्यक्षात तुमच्या युगाचे भयावह दर्शन घडविणारा आहे. त्यानंतर पुनरावृत्ती होते आहे म्हणून तुम्ही थांबवलेले काव्य ही नेहरू युगाची सृजनशीलता संपल्याची जातिवंत खूण होती. तुम्ही तिचा सहज स्वीकार केला हा तुमचा मोठेपणा ! ज्ञानेश्वरांनी कार्य संपले म्हणून घेतलेली समाधी आणि तुमच्या कवितेने घेतलेली समाधी ह्यात मला तरी कधीच फरक दिसला नाही. नेहरूंच्या मृत्यूनंतर जन्मलेल्या आमच्या पिढीला नेहरूयुग तुमच्या कवितेत दिसले ते असे ! नंतरच्या नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, तुलसी परब वगैरे कवींसाठी आवश्यक असणाऱ्या पोषक काव्यात्मक भूमीची मशागत प्रामुख्याने तुम्ही आणि मुक्तिबोधांनीच केली.

मराठीतील तुमच्या प्रेमकविता हा मराठी माणसाच्या प्रेमजाणिवेचा एक वेधक वळणटप्पा होय. तांबे, बोरकर, शिरवाडकर प्रभृतींची प्रेमकविता गृह, गृहिणी आणि गृहस्थ यांच्या त्रिकोणी जाणिवेतून कधीच मोकळी झाली नाही. (गांधीयुगाला साजेसे घरगुती सुंदर तपशील बोरकर आणि शिरवाडकरांच्या कवितेत आढळतात.) त्यानंतर मर्ढेकरांनी मराठीत पहिली पुरुषी प्रेमकविता लिहिली, तर पु. शि. रेगेंनी मराठीत पहिली स्त्रैण प्रेमकविता लिहिली. मर्ढेकर आणि पु. शि. रेगे ह्या दोघांतील आशय आणि आकृतीचा जो फरक होता तो मूलतः पुरुष आणि स्त्रैण वृत्तीतील फरक होता. आणि त्यांच्या कथा/कादंबऱ्यांची पुढील वाटचाल ह्या भिन्न वृत्तींना धरूनच झाली. रेग्यांनी लिहिलेल्या कादंबऱ्या ह्या स्त्रैण जाणिवेने लिहिलेल्या कादंबऱ्या आहेत. (नंतर ग्रेसने ह्या स्त्रैण जाणिवेची परंपरा समर्थपणे चालविली. आजही बहुतेक बायका ह्या दोघांच्या प्रेमात पडतात त्याचे कारण हेच आहे.) मर्ढेकरांनी मात्र आपल्या पुरुषी अस्मितेसह सर्व कविता लिहिली. पण मर्ढेकरांचा पुरुष हा पादाकुलकामुळे फारसा मोकळा होऊ शकला नाही. तुम्ही मर्ढेकरांचा हा पुरुष केवळ सांभाळून थांबला नाहीत तर स्त्री-पुरुषामध्ये समान रूपाने अस्तित्वात असलेल्या

पशुचित्ताची मिती त्याला दिली, त्याला मोकळे केलेत. 'माझी वासना पशुहून सुंदर आहे' हे म्हणण्याचे धाडस तुम्ही दाखविले. तुमच्या काळाचा महिमाच असा होता की, हा पशू पूर्ण प्रकटू शकला नाही. त्याचे चांगले, सोज्वळ रूपच तुमच्या कवितेत काही मर्यादेपर्यंत प्रकटले.

तुमच्या कवितेतील स्त्री ही 'राधीव' होती; म्हणजे राधा आणि ईव्ह यांचा तो संकर होता. ईव्हची आदिमता आणि आदिमाता व राधेचा मोकळा संचार आणि शृंगार तुम्ही संकरित केलात; पण दुर्दैवाने तुम्ही काय किंवा मर्ढेकर काय दोघेही मूलतः युरोपाकडून भारतीयत्वाकडे प्रवास करणारे उलटे यात्रेकरू असल्याने दोघांच्याही कवितेत ईव्हने राधेवर मात केली. मर्ढेकरांच्यात राधा अजिबातच नव्हती. तुम्ही राधा इव्ह शेजारी आणून ठेवलीत आणि पु. शि. रेग्यांनी मात्र 'राधेची बाधा त्रिधा त्रिधा' करत अचूक पकडून तुम्हा दोघांचेही विदेशीपण अधिकच उघडे पाडले. पुढे दिलीप चित्रेंनी ह्या दोघींचे अद्वैत अचूक साधले आणि तिची शक्तीत प्रतिष्ठापना केली आणि स्वतः शिवाच्या भूमिकेत शिरून अमृतानुभवाचे खऱ्या अर्थाने अर्वाचीनीकरण केले. मात्र चित्रेंचीही नाळ फक्त युरोपशी काही प्रमाणात जोडली गेल्याने तेही पूर्ण स्त्री उभी करू शकले नाहीत. (मी विनोदाने चित्रेंच्या कवितेला 'पॅरिसमध्ये हिंडणारी अमृतानुभवी- अनुभवामृती ओवी' असे त्यामुळेच म्हणत असतो) असो. आज जेव्हा ह्या मराठी कवितेच्या शतकाकडे पाहतो तेव्हा तुमच्या ह्या 'राधीव'चे महत्त्व फारच जाणवते. तुमच्या कवितेत रांगणारी ही 'राधीव' आज मराठी कवींच्या कवितेत अनेकदा पळताना दिसते. तुम्ही आम्हाला काय दिले याचे उत्तर 'राधीव' असे आहे.

तुमच्या कवितेमधली आध्यात्मिकता मात्र मला कधीच पटली नाही. एखाद्या नाठाळ, नास्तिक मुलाला त्याच्या अतिशय भाविक आईने सक्तीने मंदिरात नेऊन त्याला नमस्कार करायला लावावा आणि त्याने मात्र आईने हात जोडले आहेत हे बघताच तेथून हळूच पळ काढावा तशी तुमची ही आध्यात्मिकता वाटते. तुमचे अभंग हे मुळातच माध्यम म्हणून तुम्ही जे सांगता आहात त्यासाठी पुरेसे समर्थ आहेत, असे वाटत नाही. हीच गोष्ट गझलेबाबतची ! गझलेची सर्वांगीण पार्श्वभूमी न उमजल्याने त्या गझलेच्या अलौकिक स्पर्शाला पारख्या झालेल्या वाटतात. कदाचित तुम्ही विजया राजाध्यक्षांना दिलेल्या मुलाखतीत कबूल केल्याप्रमाणे भारतीय भाषाभगिनी ज्यांत ऊर्दूही येते- तुमच्याजवळ येऊनही तुम्ही लांब राहिल्याने हे घडले असावे. तुमच्या दीर्घ कविता मात्र मला व्यक्तिशः महत्त्वाच्या वाटतात. ''मराठीतील चित्रेंच्या पूर्वीच्या सर्वच कविता ह्या कथनात्मक होत्या. चित्रेंनी त्या वास्तवसमांतर केल्या'' असे सुधीर रसाळ म्हणतात. मला वाटते पूर्ण कथनाऐवजी निवेदनात्मक अंगाने कथेचे कोलाजासारखे तपशील गोळा करणारी तुमची

दीर्घकविता हा मधला टप्पा आहे. तुम्ही दीर्घकवितेचा आकृतिबंध अधिक हाताळायला हवा होता, असे मला राहून राहून वाटते. मात्र गझलेचे मराठीकरण करण्याच्या प्रक्रियेत आणि दीर्घकविता खऱ्या अर्थाने प्रतीमात्मक करण्यात तुमचा निश्चितपणे हातभार लागला आहे, असे मला वाटते. प्रयोग करणाऱ्या कवीला अधूनमधून अपयश पत्करावे लागतेच. अनेकदा त्याच्या कवितेत यांत्रिकता आणि गिमिक्स यांचा शिरकाव होतो. तुम्ही तुमच्या कवितेत यांचा शिरकाव टाळू शकला नाहीत हे खरे, मात्र जाणिवेचे भक्षण होणार नाही याची काळजी घेण्यात तुम्ही यशस्वी झालात. तुमच्या यशाने मराठी कविता समृद्ध झाली, म्हणून तुम्हाला हे पत्र. शेवटी हे पत्र एका तरुण पोट्ट्याने लिहिलेले !

नेहरू युगाचे सर्वांगीण चित्रण करणाऱ्या कवीला नेहरूंच्या मृत्यूनंतर जन्मलेल्या कवीने दिलेला हा मुजरा ! त्यात थोडासा उद्धटपणा आहेच. शेवटी कोकणी नसलो तरी मूळचा कोकणशेजारच्या गोव्यातून वंश घेऊन आलेलो आणि तुमच्याप्रमाणेच करवीर नगरीत वाढलेलो !

कुमार आशान, कबीर आणि जनस्थान हे तिन्ही पुरस्कार तुम्ही मिळविलेत. आता प्रतीक्षा करतोय ती ज्ञानपीठाची ! नाहीतरी मर्ढेकरी पिढीतील मराठी नगरीतील साहित्यमंडळीत तुमच्याशिवाय त्यासाठी समर्थ कोण आहे ?

